**सन २००९-२०१० या गाळप हंगामात राज्यातील १३ सहकारी साखर कारखान्यांना पूर्व हंगामी कर्ज व त्यावरील व्याजाच्या परतफेडीस शासन थकहमी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
शासन निर्णय क्रमांक - शाहमी २०१०/सपवव/प्र.क्र.५/अर्थबळ.
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
**दिनांक:- २२ फेब्रुवारी,२०१०.**

**वाचा:-** १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शासन हमी १०९९/प्र.क्र.६८/शासन हमी, दिनांक ५ नोव्हेंबर, १९९९
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक शाहमी १००८/ प्र.क्र.१८/शा हमी, दिनांक २८ एप्रिल, २००८
३) साखर आयुक्तालयाचे पत्र क्रमांक साआ/क क्ष-७/ अर्थ-२/प्र.क्र ३९/१८६७/०९, दिनांक ७/११/२००९.
४) महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्यादित, मुंबई यांचे पत्र क्र. कृ औ वि/शर्करा/फा-१०८/१०१८/२००९-१०, दिनांक २४/९/२००९ व दि.५/१०/२००९.
५) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.ससाका-१००९/प्र.क्र.११०/३स, दिनांक २/१२/०९

**प्रस्तावना :-**

गळीत हंगांम २००९-१० साठी महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडील ७ (प्रपत्र -अ) व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेकडील ६ ( प्रपत्र-ब) सहकारी साखर कारखान्यांना पूर्व हंगामी कर्ज उपलब्ध करुन देण्यासाठी साखर आयुक्त महाराष्ट्र राज्य, पुणे व महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार एकूण रुपये ३१९४.०० लाख (अक्षरी रुपये एकतीस कोटी चौ-याण्णव लाख फक्त) व त्यावरील व्याज रुपये २७१.९५ लाख (अक्षरी रुपये दोन कोटी एकाहत्तर लाख पंच्याण्णव हजार फक्त) अशा एकूण रुपये ३४६५.९५ लाख (अक्षरी रुपये चौतीस कोटी पासष्ट लाख पंच्याण्णव हजार फक्त) एवढया रक्कमेच्या उत्तरदायित्वाच्या परतफेडीस शासन थकहमी देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या १३ सहकारी साखर कारखान्यांना गळीत हंगांम २००९-१० साठी एकूण रुपये ३४६५.९५ लाख (अक्षरी रुपये चौतीस कोटी पासष्ट लाख पंच्याण्णव हजार फक्त) इतक्या उत्तरदायित्वाच्या परतफेडीस पुढीलअटी व शर्तीच्या अधिन राहून शासन थकहमी देण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

२.१ अ) सदर कारखान्यांवर संबंधित महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई / जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या कर्ज मंजूरीच्या अटी बंधनकारक राहतील तसेच महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म.मुंबई यांना नाबार्डच्या कर्ज मंजूरीच्या अटी बंधनकारक राहतील.

ब) अनावश्यक खर्च टाळून आवश्यक त्या बाबींचे प्राथम्य ठरवून, कमीत कमी खर्च करणे सदर कारखान्यावर बंधनकारक राहील.

क) राज्य शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय सदर कारखान्यांना या बाबीसाठी अधिक कर्ज उभारता येणार नाही.

ड) सदर सहकारी साखर कारखान्यांची मालतारण खाती नुतनीकरणासाठी पात्र असावीत.

इ) सदर सहकारी साखर कारखान्यांनी यापूर्वी घेतलेली हमी आवाहनित झालेली नसावी.

(कृ.मा.प.)

२.२ महाराष्ट्र राज्य सहकारी बँक म., मुंबई व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा.

१) संबंधित सहकारी साखर कारखाने प्रमुख ऋणको (Prinicipal Debtor) राहील.

२) संबंधित कारखान्यांना शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय इतर कोणतेही कर्ज उभारणार नाही.

३) सदर थकहमीची मुदत हमी दिल्यापासून दि. ३१/१०/२०१० पर्यंत वैध राहील. ही हमी कारखान्यास मंजूर करण्यात येणाऱ्या हमी रक्कमेइतक्या कर्जाच्या रक्कमेपुरतीच सिमित राहील.

४) कर्जाची परतफेड करण्यास विलंब / कसूरी झाल्यास शासन हमी अवैध होईल. तसेच इतर कोणत्याही देय रक्कमेसाठी शासन हमी लागू होणार नाही.

५) सदर शासन हमीवरील कर्ज वसूलीकरीता साखरेचा पुरेसा साठा व इतर माल तारण / मत्ता प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतर कर्ज मंजूर करण्यात यावे. साखर साठयाचे कोणत्याही प्रकारे नुकसान होणार नाही व त्याच्या सुरक्षिततेची जबाबदारी बँक घेईल व या साठयाचे संरक्षण होईल याची व्यवस्था करील.

६) कारखान्याने उत्पादीत केलेल्या सर्व साखरेची विक्री शासन हमीवर कर्ज देणाऱ्या धनको बँकामार्फत त्यांचे बँकेत एक स्वतंत्र Escrow Account व्दारे करण्यात यावी व या विक्रीपैकी प्रति क्विंटल रुपये १००/- टँगींग करुन प्राप्त होणारी रक्कम कर्ज खाती जमा करावी. या कर्ज खात्यामधील जमा निधीचा उपयोग फक्त या आदेशाव्दारे शासन हमीवर दिलेले कर्ज, त्यावरील व्याज व शासन हमी शुल्क या देय रकमाकरीता करता येईल.

७) कर्जाच्या परतफेडीबाबत होणाऱ्या कसूरीची सूचना शासनास ९० दिवसांच्या आत देणे सबंधित बँकेला बंधनकारक राहील.

८) संबंधित बँकांनी संबंधित कारखान्याकडून कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय बँकेला हमी पूर्ततेकरीता शासन हमीचा प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. संबंधित कारखान्याच्या चल/ अचल मालमत्तेची विक्री अथवा लिलाव करुन वसूली करण्याचा निर्णय बँकांनी घेतल्यास, त्याकरिता एक समिती गठित करण्यात यावी व या समितीमध्ये सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागाचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. विक्रीपक्रीयेचे अंतिमीकरण शासनाच्या मान्यतेने करण्यात यावे.

९) कारखान्यांना मंजूर केलेल्या कर्जाच्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार (Input Profroma) कर्ज फेडीच्या शेवटच्या दिनाकापर्यंत परतफेड होणे आवश्यक राहील. वैध कालावधीनंतर बँकेला शासन हमी आवाहनित करता येणार नाही. सदर कालावधीमध्ये तारण म्हणून घेतलेल्या साखर साठयाच्या विक्रीमधून कर्जाची वसूली करण्याची जबाबदारी संपूर्णपणे धनको बँकांची राहील.

१०) धनको बँका सदर कारखान्याच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल वैध कालावधीपर्यंत शासनास दर सहा महिन्यानी (३० मार्च/ ३० सप्टेंबर) सोबत जोडलेल्या विवरणपत्र **ANNEXTURE"A"** मध्ये सादर करतील.

११) धनको बँकांनी कर्ज फेडीची स्थिती दर्शविणारी माहिती दर तीन महिन्यांनी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग तसेच वित्त विभागाकडे सादर करावी.

१२) नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी उपसचिव (सहकार), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२ यांची राहील.

१३) संबंधित बँकाकडून घ्यावयाच्या कर्जाचा व्याजदर कमीत कमी असेल, याची खात्री करण्याची संपूर्ण जबाबदारी सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाची राहील.

१४) संबंधित कारखान्याकडे थकीत /देय हमी शुल्काचा भरणा प्रथम करण्यात येईल.

३. वरील पैकी कोणत्याही अटीचे उल्लघंन झाल्यास शासन हमी अवैध ठरेल.

४. <u>**हमी शुल्क**</u>

सदर हमी शासन निर्णय वित्त विभाग दिनांक ५/११/१९९९ मध्ये नमूद केलेल्या अटी तसेच खालील अटी व शर्तीच्या अधिन राहील -

(अ) संबंधित सहकारी साखर कारखान्यास प्रतिशत प्रतिवर्षी हमी शुल्काचा दर वित्त विभागाच्या दिनांक ५/११/१९९९ च्या शासन निर्णयानुसार संबंधित कारखान्याकडे यापूर्वीच्या शासन हमीवरील कर्जाची / हमीशुल्काची थकबाकी असल्याने या आदेशान्वये देण्यात येत असलेल्या शासन हमीवरील कर्जासाठी हमीशुल्काचा दर प्रतिशत प्रतिवर्ष रु.४/- इतका राहील.

(ब) हे हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (total maximum outstanding amount) देय राहील. हमीशुल्काच्या परिगणनेसाठी, महिन्यातील १५ दिवसापेक्षा कमी दिवस वगळण्यात यावेत आणि १५ दिवस किंवा त्यापेक्षा अधिक दिवसांचा कालावधी पूर्ण महिना म्हणून धरण्यात यावा. हमी मंजूर केलेल्या शासन निर्णयाचा दिनांक आणि कर्जरोख्याची प्रत्यक्ष उभारणी यामध्ये मंदनअवधी (Time Lag ) असला तरी हमीशुल्क, हमी दिल्याच्या दिनांकापासून उपरोक्त कार्यपध्दतीनुसार भरावे.

(क) हमी शुल्काचा भरणा दर ६ महिन्यांनी करण्यास सबंधित कारखान्याचे व्यवस्थापकीय संचालक हे जबाबदार असतील, प्रत्येक विर्तिय वर्षाच्या ३१ मार्च/ ३० सप्टेबर रोजी अदत्त असलेल्या घटना साक्षेप दायित्वावर (Contingent Liablility) अनुज्ञेय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल / १ ऑक्टोबर, रोजी करावा.

(ड) हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून थकित हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकित हमी शुल्काची वसूली त्यानंतर त्यापेक्षा कमी जून्या थकित हमी शुल्काची वसूली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

(इ) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास कारखान्याकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकित रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व पुढील काळासाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

(ई) बॅकेने शासनाच्या "००७५- संकीर्ण, सर्वसाधारण सेवा -१०८ - हमी शुल्क " या लेखाशिर्षाखाली साखर कारखान्याकडून देय असलेल्या हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

(उ) संबंधित सहकारी साखर कारखान्याने देय हमी शुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमी शुल्क बँक शासनाकडे भरणा करील व कारखान्याकडून वसूल करील अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

(ऊ) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ कारखान्याने चलनाची साक्षांकित प्रत सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग आणि वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

५. सहकारी साखर कारखान्यांना मशिनरी दुरुस्तीकरीता कर्ज घेण्यासाठी देण्यात आलेली उपरोक्त शासन हमी भविष्यात पूर्वोदाहरण म्हणून देता येणार नाही

६. वित्त विभागाच्या शासन निर्णय क्रमांक शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/ शासन हमी दिनांक ५/११/१९९९ अन्वये विहीत केलेले निविष्ठी प्रपत्र सोबत जोडले आहे.

७. महाराष्ट्र राज्य सहकारी बॅंक मर्यादित, मुंबई व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकांसमवेत करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरीता सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागातील उप सचिव आणि वित्त विभागातील उप सचिव ( शासन हमी ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (३ स) यांची नस्ती क्रमांक ससाका १००९/प्र.क्र.११०/ ३ स, वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्रमांक-६/२००९-२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या बेव साईटवर उपलब्ध असून, त्यांचा सांकेतांक **क्रमांक २०१००२२२१४४८२२००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावांने,**

**(मीनल पेडणेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहाय्यक.
३) प्रधान महालेखाकार ( लेखापरिक्षा - १ ) महाराष्ट्र राज्य मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) अध्यक्ष / कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी बँक मर्या.,मुंबई.
९) अध्यक्ष / कार्यकारी संचालक, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्या., लातूर/अहमदनगर/जळगांव/कोल्हापूर.
१०) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी साखर कारखाना संघ, मर्या.,साखर भवन, नरिमन पॉईंट, मुंबई.
११) सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) साखर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे (५ प्रती)
१३) वित्त विभाग, व्यय-२/ऋण व हमी संनियंत्रण कक्ष , मंत्रालय, मुंबई.
१४) कक्ष अधिकारी-३स/१६ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग.
१५) निवडनस्ती - अर्थबळ.

# प्रपत्र-अ

## महाराष्ट्र राज्य सहकारी बँकेकडील कारखाने

(रुपये लाखात)

| अ.क्र | कारखान्याचे नांव व जिल्हा | मुद्दल | व्याज | एकूण |
|---|---|---|---|---|
| १ | आप्पासाहेब नलावडे ससाका जिल्हा. कोल्हापूर | २५१.०० | २५.४१ | २७६.४१ |
| २ | वसंत ससाका (पुसद) जि. यवतमाळ | २५१.०० | २५.४१ | २७६.४१ |
| ३ | अगस्ती ससाका जि. अहमदनगर | २५१.०० | २५.४१ | २७६.४१ |
| ४ | अशोक ससाका जि. अहमदनगर | २५१.०० | २५.४१ | २७६.४१ |
| ५ | डॉ. प.डी. वि. वि. पाटील ससाका जि. अहमदनगर | २८८.०० | २९.१६ | ३१७.१६ |
| ६ | गणेश ससाका जि. अहमदनगर | १९०.०० | १९.२४ | २०९.२४ |
| ७ | कादवा ससाका जि. नाशिक | १६३.०० | १६.५० | १७९.५० |
| | **एकूण** | **१६४५.००** | **१६६.५४** | **१८११.५४** |

# प्रपत्र-ब

## जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेकडील कारखाने

(रुपये लाखात)

| अ.क्र | कारखान्याचे नांव व जिल्हा | बँकेचे नांव | मुद्दल | व्याज | एकूण |
|---|---|---|---|---|---|
| १ | डॉ. बी.बी. तनपुरे ससाका अहमदनगर | अहमदनगर जिमस बँक अहमदनगर | २८८.०० | १९.४४ | ३०७.४४ |
| २ | वृध्देश्वर- ससाका अहमदनगर | अहमदनगर जिमस बँक अहमदनगर | २५१.०० | १६.९४ | २६७.९४ |
| ३ | भोगांवती ससाका जि. कोल्हापूर | कोल्हापूर जि.म.स बँक कोल्हापूर | ३४५.०० | २३.२९ | ३६८.२९ |
| ४ | चोपडा ससाका जि. जळगाव | जळगांव जिमस बँक म., जळगांव | २५१.०० | १७.५७ | २६८.५७ |
| ५ | संत शिरोमणी मारोती महाराज ससाका जि. लातूर | लातूर जि मस बँक म., लातूर | १६३.०० | १०.६० | १७३.६० |
| ६ | डॉ. प. डी.वाय पाटील ससाका जि. कोल्हापूर | सिंधुदुर्ग जिमस बँक म., | २५१.०० | १७.५७ | २६८.५७ |
| | **एकूण** | | **१५४९.००** | **१०५.४१** | **१६५४.४१** |

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from:** **To**

Guarantee & **Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at Beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Total Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (i) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O. )

| | |
|---|---|
| 9 Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| 10. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| 11. Is in the opinion of lending institute, the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| 12 Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| 13. If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| 14. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| 15. Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |